**अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ नुसार महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळातील वर्ग अ ते ड मधील अपंगासाठी <u>सुयोग्य पदे निश्चित करण्याबाबत......</u>**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- अपंग -२०११/प्र.क्र.६ / सुधार -३,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १४ जानेवारी, २०११

**वाचा:-** १)अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही -१०९९/प्रक्र ३७/९९/१६-अ, दि. ०५/०३/२००२
३) शासन निर्णय क्रमांक :- अपंग -२००४/प्र.क्र.४५०/ सुधार -३,दि. २२ जुलै, २००८
४) शासन निर्णय क्रमांक :- न्यायाप्र -२०१०/प्र.क्र.५/ सुधार -३,दि. ३ ऑगस्ट, २०१०
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांचे पत्र क्र. अविविम/प्र.क्र.४४९/२०१०/३४ दिनांक: १० जानेवारी, २०११

**प्रस्तावना :-** अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ दि.७फेब्रुवारी, १९९६ पासुन लागू झाला आहे. या कायद्यान्वये अपंगांच्या सर्वांगिण विकासासाठी व त्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्यासाठी शासन सेवेत ३% पदे आरक्षित करण्याची तरतूद आहे. त्यानुसार सरळसेवा भरतीच्या पदांवर अपंगांना आरक्षण विहित करणे / सुट देणे या संदर्भात याचिका क्र.१२९/०३ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार व पुर्नरचित तज्ञ समितीने केलेल्या सुधारणानुसार सामाजिक न्याय विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील गट-अ ते गट-ड संवर्गातील सरळसेवेने भरावयाच्या पदांसाठी संदर्भ क्र.३ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता. आता अपंग व्यक्तींसाठी सुधारित पद निश्चिती करण्यासंदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या जनहित याचिका क्र.२२५/२००९ मध्ये मा. उच्च न्यायालयाने केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार अपंगांसाठी शासकीय /निम शासकीय सेवेतील आरक्षित पदे सुनिश्चित करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यास अनुसरुन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र. ४ अन्वये, केंद्र शासनाने अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ मधील तरतुदीस अनुसरुन त्यांच्या अखत्यारितील आस्थापनेवरील अपंग व्यक्तींसाठी पद निश्चितीबाबत यादी प्रसिध्द केलेली आहे, त्या यादीनुसार राज्य शासनाच्या अखत्यारितील शासकीय व निम शासकीय आस्थापनेवरील जी पदे समान आहेत ती पदे संबंधित विभागांनी अपंगांसाठी निश्चित करण्याबाबतच्या सुचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

२. त्यास अनुसरुन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळावरील सरळसेवेने भरण्यात येणाऱ्या गट-अ ते गट-ड संवर्गातील पदे अपंगांसाठी निश्चित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** :- संदर्भाधीन दि. २२/०७/२००८ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन पुढीलप्रमाणे सुधारीत आदेश देण्यात येत आहेत.

*कृ.मा.प.....*

२.	अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ मधील तरतुदीनुसार केंद्र शासनाने ज्या यादीन्वये त्यांच्या अखत्यारितील आस्थापनेवरील जी पदे अपंग व्यक्तींसाठी आरक्षण देण्यासाठी निश्चित केलेली आहेत त्या यादीशी तुलना करुन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळावरील गट-अ ते गट-ड या संवर्गातील सरळसेवा भरतीने भरावयाच्या पदांसाठी (केंद्र शासनाच्या यादीतील समान पदे विचारात घेऊन) सोबत जोडलेल्या अनुक्रमे परिशिष्ट "अ" मधील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे अपंगांसाठी पदे सुनिश्चित करण्यात येत आहेत.

३.	अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्काचे संरक्षण) अधिनियम १९९५ या अधिनियमातील कलम ३२ व ३३ नुसार महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळावरील गट-अ ते ड या संवर्गातील पदांवरील सरळसेवा भरतीमध्ये किमान ४०% अपंगत्व असलेल्या अपंग व्यक्तींसाठी प्रत्येकी १% याप्रमाणे ३% आरक्षण लागू राहील. तसेच गट-क व गट-ड मध्ये सामान्य प्रशासन विभागाच्या दि.५/३/२००२ च्या शासन निर्णयाप्रमाणे पदोन्नतीमध्ये आरक्षण लागु राहील.

४.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०११४२०५२१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( कि. पां. वडते )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ, मुंबई
आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य पुणे
महालेखापाल, महाराष्ट्र -१ /२ ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) मुंबई/ नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सामान्य प्रशासन विभाग(का-१६ अ), मंत्रालय, मुंबई
सदस्य, तज्ञ समिती,
मा. मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव,
निवड नस्ती, सुधार-३

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री (सा.न्या) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (सा.न्या) यांचे खाजगी सचिव
सर्व अप्पर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडिया बिल्डींग,हुतात्मा चौक,मुंबई (पत्राने )
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त,अपंगकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, वि.जा.भ.ज. व इ.मा.व. संचालनालय,पुणे
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व समाजकल्याण अधिकारी,जि.प.
विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती-सुधार-३.

(शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक :- अपंग -२०११/प्र.क्र.६ / सुधार -३,दिनांक :- १४ जानेवारी, २०११ चे जोडपत्र )

## परिशिष्ट "अ "

## महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ

| अ.क्र. | पदनाम | शारीरिक | सुयोग्य पदासाठी अपगत्वाचा प्रवर्ग | कामाचे स्वरूप | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | व्यवस्थापकिय संचालक | S/W/RW/SE/C | LV,HH,OL,OA,BL,OAL | संचालक मंडळाच्या बैठका आयोजित करणे, कर्ज मंजूर समितीच्या बैठका आयोजित करणे, महालेखापाल व विधानमंडळास वार्षिक अहवाल सादर करणे, माहिती अधिकारातंर्गत संबंधित कामे करणे, वार्षिक अंदाजपत्रक शासनाला सादर करणे, अधिकाऱ्यांवर नियंत्रण ठेवणे, इतर अनुषंगिक कामे. | एकाकी पद असल्याने आरक्षण नाही. |
| २ | महाव्यवस्थापक | S/ST/W/RW/MF/C/SE | LV,HH,OL,OA,BL,OAL | कायदेविषयक बाबी, कार्यालयीन कार्यपध्दतीवर नियंत्रण ठेवणे, कर्मचाऱ्यांवर नियंत्रण ठेवणे, जिल्हा व्यवस्थापकांवर नियंत्रण ठेवणे. माहिती अधिकारातंर्गत संबंधित कामे करणे, इतर अनुषंगिक कामे. | एकाकी पद असल्याने आरक्षण नाही. |
| ३ | लेखाधिकारी/ उपव्यवस्थापक | S/BN/SE/RW/MF/H/C | LV,HH,OL,OA,BL,OAL | कार्यालयातील लेखा व्यवस्थित व अदयावत ठेवणे, हाताखालील कर्मचाऱ्यांवर देखरेख ठेवणे, लेखालिपीकाने लिहिलेल्या कॅशबुक/लेजर/बिले इत्यादींची तपासणी करणे, वार्षिक अंदाजपत्रक तयार करणे, महामंडळाचे नफा-तोटा पत्रक व ताळेबंद तयार करणे, | एकाकी पद असल्याने आरक्षण नाही. |
| ४ | सहाय्यक | S/ST/W/SE/H/C | LV,HH,OL,OA,BL,OAL | कार्यालयातील विषयाशी संबंधित टिप्पणी लेखन तयार करणे, संगणकीय प्रणाली अदयावत करण्यास सहाय्य करणे. इतर अनुषंगिक कामे. | |
| ५ | निम्नश्रेणी लघुलेखक | S/ST/W/MF/SE/RW/H/C | LV,B, HH,OL,OA,BL,OAL | श्रुतलेखन घेऊन त्याचे टंकलेखनात रुपांतर करुन देणे, टंकलेखन यंत्राचा व संगणकाचा वापर करुन श्रुतलेखन टंकलिखीत करुन देणे, टंकलिखित कागदपत्रे तपासून वरिष्ठांना सादर करणे, | एकाकी पद असल्याने आरक्षण नाही. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६ | लिपिक | S/ST/W/MF/ SE/RW/H/ | LV,HH,OL,OA,BL,OAL | लिपिक वर्गीय सर्वसाधारण काम करणे, टपालाची नोंद करणे, टपाल निर्गमित करणे, नियमित पत्रव्यवहार करणे, माहितीचे तक्ते तयार करणे, टंकलेखनाचे काम करणे, संगणकावर काम करणे, लेखाविषयक व पगारपत्रक विषयी लेखन व टंकलेखनाचे काम करणे, | |
| ७ | शिपाई | S/ST/W/PP/ L/KC/SE/R W/C/MF | LV,B, HH,OL,OA,BL,OAL | टपालाची ने-आण करणे, कार्यालयातील नस्त्या व्यवस्थित लावून ठेवणे, कार्यालयातील टपाल स्विकारणे, इतर अनुषंगिक कामे. | |

**ABBREVIATION USED:**

S= Sitting, BN= Bending, SE=Seeing, RE= Reading & Writting, C=Communication, MF= Manipulation by Fingers, PP= Pulling & Pushing, L= Lifting, KC= Kneeling & Croutching, ST= Standing, W= Walking, BLA= Both Legs & Arms, BA= Both Arms, OL= One Leg, BL= Both Leg, OA = One Arm, OAL= One Arm & One Leg, B= Blind, LV= Low Vision, H= Hearing, OH= Orthopaedically Handicapped, CP= Cerebral Palsy, LC= Leprosy Cured, VH= Visually Handicapped, HH= Hearing Handicapped.